**प्रथम टप्प्यात राज्यातील पाच जिल्हयात रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र सुरु करणे संगणक यंत्रणा खरेदी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो-२०१४/प्र.क्र.२१५/रोस्वरो-१**

जी.टी.हॉस्पीटल कॉम्प्लेक्स इमारत, ५ वा मजला

नवीन मंत्रालय, मुंबई-४००००१

तारीखः- २०/०३/२०१५

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोगार विभाग, रोस्वरो-२०१२/प्र.क्र.३०९/रोस्वरो-१ दिनांक १९ मे,२०१४

२) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.१०९/ रोस्वरो-१ दिनांक २१ ऑगस्ट,२०१४

३) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.२१५/ रोस्वरो-१ दि.२९ ऑक्टोबर,२०१४

४) आयुक्त,रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांचे पत्र क्र.रोस्वरां—७/संगणक/ २२६ दि.१७जानेवारी,२०१४

५) दि.२८ नोव्हेंबर,२०१४ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीचे इतिवृत्त

६) शासन निर्णय क्रमांकः कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र. रोस्वरो-२०१४/ प्र.क्र.२१५/रोस्वरो-१ दि.३०.०१.२०१५

७) आयुक्त , रोजगार,स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांचे पत्र क्र. रोस्वसं-९/ सीजीसीसी/प्रोजेक्टर/२५०४ दि.१७ मार्च,२०१५

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१२/प्र.क्र.३०९/रोस्वरो-१ दि.१९ मे,२०१४ अन्वये राज्यात रोजगार व स्वयंरोजगार केंद्रामध्ये व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला असून पहिल्या टप्प्यात मुंबई उपनगर, औरंगाबाद, नागपूर, सांगली व सिंधुदुर्ग येथे अशी केंद्रे स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.१०९/रोस्वरो-१ दि.२१ ऑगस्ट,२०१४ अन्वये सदर योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आलेला आहे. तसेच शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.२१५/रोस्वरो-१ दि.२९ ऑक्टोबर,२०१४ अन्वये सदर

योजनेसाठी ५ स्कॅनर व २५ प्रिंटर Directorate General of Supplies & Disposals, Govt. of Indiaयांच्या दरकरारानुसार खरेदी करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच दि.२८ नोव्हेंबर,२०१४ रोजी पार पडलेल्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेस अनुलक्षून सदर योजनेच्या अंतर्गत खरेदी करावयाच्या संगणक व त्यासंबंधातील यंत्रणेच्या खरेदीस येणा-या खर्चास शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.२१५/रोस्वरो-१ दि.३० जानेवारी,२०१५ अन्वये वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. उपरोक्त दि.३०.०१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये DGS&D च्या दर करारावर असलेल्या १० प्रोजेक्टरच्या खरेदीस वित्तीय व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे. सदर मंजूरीस अनुलक्षून आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांनी व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रासाठी १० प्रोजेक्टर खरेदीसाठीचे आदेश DGS&D यांच्या दरकरारावरील नमूद पुरवठादार मे.ॲग्माटेल इंडिया प्रा.लि. यांना दि.०३.०२.२०१५ रोजी पाठविले. परंतु, सदर प्रोजेक्टरची किंमती DGS&D च्या दि.१६.०२.२०१५ च्या ॲमेडमेंटनुसार वाढलेली असून त्याप्रमाणे किंमतीत प्रति नग रु.७७६.०९ ( रुपये सातशे शहात्तर आणि पैसे नऊ मात्र) प्रमाणे वाढ झाली असून, आता प्रोजेक्टरची सुधारीत किंमत रु.४१,३७२.०० (रुपये एक्केचाळीस हजार तीनशे बहात्तर मात्र) इतकी होत आहे. तसेच दि.१६.०२.२०१५ रोजीची ॲमेंडमेट पूर्वलक्षी प्रभावाने दि.०१.०१.२०१५ पासून लागू असल्याचे DGS&D च्या दर करारात नमूद केलेले आहे. सबब, उपरोक्त १० प्रोजेक्टर्सच्या खरेदीकरिता प्रती नग रु.७७६.०९/- प्रमाणे रु.७७६०.९० ( रुपये सात हजार सातशे साठ आणि नव्वद पैसे फक्त ) एवढा वाढीव खर्च होणार आहे. सबब, या शासन निर्णयान्वये उपरोक्त नमूद व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रासाठी खरेदी करावयाच्या १० प्रोजेक्टरच्या खरेदीसाठी येणा-या रु.७७६०.९०/- (रुपये सात हजार सातशे साठ आणि नव्वद पैसे फक्त) एवढया वाढीव खर्चास वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र-१०.०८/प्र.क.७०/२००८/विनियम, दि.१५ मे,२००९ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप-विभाग-दोन मधील अनु.२८-अ नियम क्र.७६ नुसार प्रशासनिक विभागाला असलेल्या अधिकारास अनुलक्षून व खालील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) उपरोक्त यंत्रणेची खरेदी विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

२) यंत्र सामुग्री प्राप्त झाल्याखेरीज व ते निश्चित केलेल्या विनिर्दीष्टाप्रमाणे असल्याची खातरजमा केल्याखेरीज तसेच, यंत्रांच्या गुणवत्तेची खात्री पटल्याखेरीज कंपनीस रक्कम प्रदान करण्यात येऊ नये.

३) सदर यंत्रणेची नोंद संबंधित कार्यालयाच्या जडवस्तू संग्रह नोंदवहीत घेण्यात यावी.

४) उपरोक्त यंत्रणेची खरेदीही उपलब्ध निधीच्या मर्यादेत करण्यात यावी.

४. सदर खर्च शासन निर्णय,रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्र.रोस्वरो-२०१४/प्र.क्र.१०९/रोस्वरो-१ दिनांक २१ ऑगस्ट,२०१४ अन्वये लेखाशीर्ष मागणी क्र.झेड ए-०१, प्रधान लेखाशीर्ष-२२३०-कामगार व सेवायोजन, ०२- सेवायोजना सेवा, ००१-सेवायोजन व प्रशासन, ०६- व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रांची स्थापना (२२३०६०३८),१७ संगणक (योजनांतर्गत योजना) अंतर्गत प्रथम टप्प्यात राज्यातील पाच जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र सुरु करण्याकरिता करावयाच्या संगणक खर्चासाठी वित्तीय वर्ष २०१४-२०१५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३१४३६१६६६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2015.03.24 15:39:10 +05'30'

**( सं.छ.तडवी )**

अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकणभवन, नवी मुंबई
६. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-१५,मंत्रालय,मुंबई

८. नियोजन विभाग, का-१४७१,मंत्रालय, मुंबई

९. महाराष्ट्र कौशल्य विकास संस्था, मुंबई

१०.संचालक, यशदा, पुणे

११.कक्ष अधिकारी (रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई -०१

१२.निवड नस्ती (रोस्वरो-१)